**हिरानंदानी ट्रस्ट, मुंबई संचालित हिरानंदानी ट्रस्ट स्कुल, तळेगाव जि.रायगड या शाळेचे, मौजे भोकरपाडा, ता. पनवेल जि.रायगड येथे स्थलांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राशास्थ ३३२४/प्र.क्र.४३१/२४/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२४

**वाचा :**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ ३३२१/प्र.क्र.४०१/एसएम-१ दिनांक २८ जुलै, २०२१.

**संदर्भ :**

विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांचे जा.क्र.शिउसं/एसएम-१/स्थलांतर/२०२३-२४/२५५२, दि.१५/०३/२०२४ चे पत्र

**प्रस्तावना :-**

हिरानंदानी ट्रस्ट ,मुंबई संचालित हिरानंदानी ट्रस्ट स्कूल, तळेगाव, ता.खालापूर जि.रायगड या इंग्रजी माध्यमाच्या स्वंयअर्थसहाय्यित उच्च माध्यमिक (इ १ ली ते १२ वी) शाळेचे, मौजे भोकरपाडा, ता. पनवेल जि.रायगड येथे स्थलांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळेचे भौतीक सुविधा पूर्ण असलेल्या इमारतीत स्थलांतर प्रस्तावित केले आहे. त्यामुळे सदर शाळेचे वर नमूद ठिकाणी स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच इच्छुक विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील.

(२) सदर शाळा इंग्रजी माध्यमाची स्वयंअर्थसहाय्यित तत्त्वावरील असल्याने शाळेत कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचा-यांचे संपूर्ण दायित्व संस्थेवर राहील.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(४) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाहीत.

(५) सदर स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांनी सदर शाळेच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५२२४४००१७२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2024.03.16 16:57:38 +05'30'

**(प्रविण मुंढे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई
३. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक), जिल्हा परिषद, रायगड
४. अध्यक्ष/ सचिव, हिरानंदानी ट्रस्ट, मुंबई.
५. निवडनस्ती (एसएम-१).